महिला व बाल विकास विभागाअंतर्गत क्षेत्रिय अस्थापनांवरील गट-ब संवर्गातील अधिका-यांच्या प्रशासकीय बदल्या २०१७

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

**शासन आदेश क्रमांक: मबाआ-२०१७/प्र.क्र.२०/कार्या-७अ**

**मंत्रा़लय,मुंबई- ४०० ०३२.**

**दिनांक- ३० मे, २०१७.**

**: शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ मधील तरतूदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने बदली प्रस्तावित असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत उक्त अधिनियमाच्या कलम ४ (१), ४ (२) व ४ (३) मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या पुर्व मान्यतेने या विभागातील खालील अधिका-यांची त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी सार्वजनिक सेवेच्या हितार्थ प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात येत आहेत.

| अ.क्र | अधिका-याचे नाव सध्या धारण केलेले पद व ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.डी.व्ही.बानाईत, अधिक्षक, शासकीय मुलांचे कनिष्ठ/वरिष्ठ बालगृह , शांतीभवन, उल्हासनगर-५,ठाणे | अधिक्षक शासकीय मुलाचे वरिष्ठ बालगृह,नागपूर | रिक्त पदावर |
| २ | श्री. व्ही. एस. चौधरी, अधिक्षक, शासकीय पुरुष भिक्षेकरीगृह, जांभुळ, ता. कल्याण, जि.ठाणे | बाल विकास प्रकल्प अधिकारी, (ग्रामिण) शहापूर जि. ठाणे | रिक्त पदावर |
| ३ | श्री. व्ही. डी. तरवडे, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा.) पनवेल, रायगड | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी वर्ग-२ विभागीय उपआयुक्त कार्यालय, कोकण विभाग,मुंबई | श्री.के.जी वळवी, यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी. |
| ४ | श्रीम.व्ही.एस.पाटील, अधिक्षिका, शासकीय मुलींचे विशेषगृह, मुंढवा,पुणे | अधिक्षक शासकीय मुलींचे बालगृह पैठण, जि.औरंगाबाद | श्री. बी.एम. बंडगर, यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी. |

| अ.क्र | अधिका-याचे नाव सध्या धारण केलेले पद व ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| ५ | श्री. एस.टी. कु-हाडे, अधिक्षक, शासकीय पंडीत जवाहरलाल नेहरु उद्योंग केंद्र मुलांचे निरिक्षणगृह/विशेषगृह, येरवडा,पुणे | अधिक्षक, शासकीय पुरूष भिक्षेकरी स्विकार केंद्र, चेंबूर, मुंबई उपनगर | रिक्त पदी |
| ६ | श्री. एम.बी. वासनिक, सांख्यिकी अधिकारी (नियंत्रण मंडळ) | बाल विकास प्रकल्प अधिकारी, (ग्रामिण), मावळ जि. पुणे | रिक्त पदी |
| ७ | श्रीम. जे.एस.पाटील, अधिक्षिका,शासकीय तेजस्विनी महिला वसतिगृह, कोल्हापूर | बाल विकास प्रकल्प अधिकारी, (ग्रामिण), करवीर-२ जि. कोल्हापूर | रिक्त पदी |
| ८ | श्री. आर.एस. मराठे, बाल विकास प्रकल्प अधिकारी धडगांव, जि.नंदुरबार | अधिक्षक शासकीय मुलाचे बालगृह वाक, जि.जळगांव | श्री. यु.एस. टेकाळे, यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी. |
| ९ | श्री.आर.व्ही. बिरारी, बाल विकास प्रकल्प अधिकारी अक्कलकुवा, जि. नंदुरबार | बाल विकास प्रकल्प अधिकारी, (ग्रामिण), धुळे-२ जि. धुळे | रिक्त पदी |
| १० | श्री. यु.एस. टेकाळे, अधिक्षिक, शासकीय मुलांचे वरिष्ठ बालगृह, वाक ता. भडगाव जि.जळगांव | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा) धडगांव जि.नंदुरबार | श्री. आर.एस. मराठे, यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी |
| ११ | श्री.एम.एन. दराडे, अधिक्षक, शासकीय पुरुष भिक्षेकरीगृह, पिंपळगावपिसा, अहमदनगर | अधिक्षक पंडीत जवाहलाल नेहरु उद्योग केंद्र येरवडा,पुणे | श्री. एस.टी. कु-हाडे, यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी |

| अ.क्र | अधिका-याचे नाव सध्या धारण केलेले पद व ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १२ | श्री. एम.एम.कांबळे, अधिक्षक, शासकीय मुलांचे कनिष्ठ बालगृह, अमरावती | अधिक्षक शासकीय भिक्षेकरी गृह,नागपूर, जि- नागपूर | रिक्त पदी |
| १३ | श्री. बी.एम. बंडगर, अधिक्षक शासकीय मुलींचे बालगृह क/व पैठण जि. औरंगाबाद | बाल विकास प्रकल्प अधिकारी, (ग्रामिण), लातूर (मुरुड-२) जि.लातूर | रिक्त पदी |
| १४ | श्री. बी.ए. सावंत, बाल विकास प्रकल्प अधिकारी, गंगापुर-१, औरंगाबाद | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी वर्ग-२ विभागीय उपआयुक्त कार्यालय, औरंगाबाद | रिक्त पदी |
| १५ | श्री. एस.व्ही. अंकुश, बाल विकास प्रकल्प अधिकारी, भोकरदन जि. जालना | बाल विकास प्रकल्प अधिकारी, (ग्रामिण),नेवासा जि.अहमदनगर | रिक्त पदी |
| १६ | श्री.आर.व्ही. कड, बाल विकास प्रकल्प अधिकारी, (ग्रामिण),जालना,जि.जालना | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी वर्ग-२ हिंगोली | रिक्त पदी |
| १७ | श्री. के.व्ही. तिडके, शासकीय मुलाचे क/व बालगृह परभणी | अधिक्षक, शासकीय मुलांचे कनिष्ठ/वरिष्ठ बालगृह,लातूर | रिक्त पदी |
| १८ | श्री. एम.आर. गालफाडे, बाल विकास प्रकल्प अधिकारी, (ग्रामिण), धारुर,बीड | अधिक्षक, शासकीय मुलांचे कनिष्ठ/वरिष्ठ बालगृह, परभणी | श्री. के.व्ही. तिडके, यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी |
| १९ | श्री. व्ही. एस. बोराटे, अधिक्षक शासकीय मुलीचे कनिष्ठ बालगृह. नांदेड | बाल बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामिण), नांदेड जि.नांदेड | रिक्त पदी |
| २० | श्री. एस.डी. हावळे, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामिण) कळंब, उस्मानाबाद | अधिक्षक,शासकीय मुलांचे कनिष्ठ वरिष्ठ बालगृह, सोलापूर | रिक्त पदी |

२. (१) श्रीम. पी.आर.तारु, अधिक्षिका, शासकीय आशादीप महिला वसतिगृह, जळगांव, (२) श्री. ए.बी. दंडगव्हाळ, बाल विकास प्रकल्प अधिकारी राहुरी, अहमदनगर, (३) श्रीम. एम.डी. भस्मे, अधिक्षक, शासकीय मुलांचे वरिष्ठ बालगृह, अमरावती, (४) श्रीम. बी.बी.मानकर, अधिक्षिका, शासकीय करुणा महिला वसतिगृह, नागपूर, या अधिकाऱ्यांना सध्याच्या कार्यरत पदावर १ वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना कळविण्यात येते की, वरीलप्रमाणे पदस्थापना देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना त्यांचे अधिनस्त पदस्थापनेचे आदेश तात्काळ निर्गमित करावेत. बदली झालेल्या अधिका-यांना कार्यालय प्रमुखांनी तात्काळ कार्यमुक्त करावे व सदरील अधिका-यांनी त्यांच्या बदलीच्या पदावर तात्काळ रूजु व्हावे. त्यांचे पुढील वेतन व भत्ते रूजू होणा-या पदावरच काढण्यात येतील याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

४. संबधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्विकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवरजाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक- सीडीआर १०८२/ २५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरूपाची आवेदने सादर केल्यास , ते शिस्तभंगाच्या कार्यवाहीस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

५. आयुक्त महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रूजू होण्यास सांगावे. जे कार्यालय प्रमुख बदली झालेल्या अधिकाऱ्यांना विहीत मुदतीत कार्यमुक्त करणार नाहीत, अशा अधिकऱ्यांच्या विरूध्द शिस्तभंग कार्यवाहीबाबतचा प्रस्ताव आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी शासनास सादर करावा.

६. संबधित अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास कळवावा. जे अधिकारी नियुक्तीनंतर विहीत कालावधीत बदली झालेल्या पदावर रूजू होणार नाहीत, अशा अधिकाऱ्याविरूध्द आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी शिस्तभंगविषयक कार्यवाहीचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

७. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांची पदस्थापना प्रशासकीय कारणास्तव करण्यात येत असल्याने त्यांना बदलीविषयक फायदे अनुज्ञेय राहतील.

८. वरिलप्रमाणे करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांची पदस्थापनेच्या आदेशासोबत त्यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक, तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र बदली करण्यात आलेल्या नवीन कार्यालयाकडे तात्काळ पाठविण्यात यावे.

९. वरिलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांना पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये वा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत.

१०. वरिलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांनी बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास

संबंधित अधिकाऱ्यांवर राजकीय दबावाबाबतची ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणुक) नियम १९७९ मधील क्रमांक २३ व क्रमांक (३) (३) चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

११. वरिलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिकऱ्यांना पदस्थापनाने देण्यात येणा-या पदावर रुजू करुन घेताना, ते रजेवर/गैरहजर होते किंवा कसे याबाबतची खातरजमा त्यांना पदस्थापनेवर हजर करुन घेणाऱ्या कार्यालयाने करावी. सदर अधिकारी वैद्यकीय कारणास्तव गैरहजर असतील तर त्यांना हजर करुन घेण्यापूर्वी वैद्यकीय मंडळासमोर पाठवावे. जर अन्य रजेवर होते असे आढळल्यास त्यांचेकडून न चुकता तसा रजेचा अर्ज भरुन घ्यावा आणि नंतर हजर करुन घ्यावे. तसेच रजा संदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकांतील निदेशांचे पालन करावे.

**१२.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५३०१७४२१२०४३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2017.05.31 12:36:16 +05'30'

(ला.रा.गुजर)
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१. मा.मंत्री (म.व बा.वि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२.
२. मा.राज्यमंत्री (म.व बा.वि), यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. सचिव,महिला व बाल विकास यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,मुंबई-३२.
४. सर्व विभागीय आयुक्त, (आयुक्तालयामार्फत)
५. आयुक्त,महिला व बाल विकास, पुणे.
६. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (आयुक्तालयामार्फत)
८. सर्व विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास, (आयुक्तालयामार्फत)
९. सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, ( बा.क.), जिल्हा परिषद
१०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
११.सर्व तालुका कोषागार अधिकारी, (आयुक्तालयामार्फत)
१२.महालेखापाल -१/२ (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१३.संबंधित अधिकारी (आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे. यांच्या मार्फत)
१४.निवडनस्ती (कार्यासन-७अ), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई